**शासकीय पुरुष भिक्षेकरी गृह, विसापूर, जि. अहमदनगर व शासकीय बेगर्स वर्क्स कॅम्प, माळशिरस, जि. सोलापूर या दोन संस्थांना सध्या अस्तीत्वात असलेल्या भिक्षेकरी गृहा बरोबर शासकीय भिक्षेकरी स्वीकार केंद्राची मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. भिक्षेगृ-२०१५/ प्र. क्र.२७/ का-९**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०३ जानेवारी, २०१७

संदर्भ- १) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१ यांचे पत्र क्र. मबाविआ /भिप्रशा/ का.८/ प्र.१/ २०१५-१६/ १२८, दिनांक- २७.०४.२०१५
२) सहाय्यक आयुक्त (भिप्रशा), महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१ यांचे पत्र क्र. मबाविआ/भिप्रशा/का-८/ प्र.१/२०१६-१७/२२५, दिनांक- २१.०७.२०१६
३) मबाविआ/भिप्रशा/का-८/ प्र-१/ २०१६-१७/२९८, दिनांक- ०७.११.२०१६
४) शासन अधिसुचना क्र. भिप्रअ-२००५/ प्र क्र १४३/ का-८, दिनांक- २९ जून, २००७.

**प्रस्तावना-**

मुंबई भिक्षा प्रतिबंध अधिनियम १९५९ च्या कलम १ (३) अनुसार शासन अधिसूचना क्र. भिप्रअ-२००५/ प्र क्र १४३/ का-८, दिनांक- २९ जून, २००७ अन्वये मुंबई भिक्षा प्रतिबंध अधिनियम १९५९ ची अंमलबजावणी संपूर्ण महाराष्ट्र राज्यामध्ये लागू करण्यात आलेली आहे. सद्य:स्थितीत राज्यामध्ये मुंबई, पुणे, नागपूर व सातारा या जिल्हयांमध्येच भिक्षेकरी स्वीकार केंद्रे आहेत. परंतु जिथे धार्मीक स्थळे आहेत त्याच्या जवळपास भिक्षेकरी स्वीकार केंद्र नाही. उदा. महालक्ष्मी, ज्योतीबा (कोल्हापूर) पंढरपूर (सोलापूर), तुळजापूर (उस्मानाबाद), शनिशिंगणापूर, शिर्डी (अहमदनगर), सप्तश्रृंगी, त्रंबकेश्वर (नाशिक) घृणेश्वर (औरंगाबाद), शेगांव (बुलढाणा) इ. महत्वाची रेल्वेस्टेशन, बसस्थानके आहेत येथेच भिक्षेक-यांची संख्या जास्त दिसून येते. तसेच कोल्हापूर, सोलापूर व उस्मानाबाद या जिल्हयातील तिर्थक्षेत्राचा विचार केला असता येथे सुध्दा मोठया प्रमाणात भिक्षेकरी असु शकतील आणि तिथे जर भिक्षेकरी पकड मोहिम राबविली तर त्यांना सध्या जवळचे सातारा येथिल भिक्षेकरी स्वीकार केंद्र आहे, जे २००-२०५ कि.मी. अंतरावर आहे. राज्यामध्ये अधिक भिक्षेकरी स्वीकार केंद्राची आवश्यकता आहे. सदर बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

उपरोक्त पार्श्वभूमीवर मुंबई भिक्षा प्रतिबंध अधिनियम १९५९ मधील कलम १२ (१) अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार आता या शासन निर्णयाव्दारे शासकीय पुरुष भिक्षेकरी गृह, विसापूर, ता. श्रीगोंदा, जि. अहमदनगर या गृहास मंजुर असलेल्या ५८० प्रवेशित संख्येपैकी **५० प्रवेशितांसाठी भिक्षेकरी स्वीकार केंद्र** व शासकीय बेगर्स वर्क्स कॅम्प, माळशिरस, जि. सोलापूर या गृहास मंजुर असलेल्या १००

प्रवेशित संख्येपैकी **५० प्रवेशितांसाठी भिक्षेकरी स्वीकार केंद्र** म्हणुन शासन मान्यता देत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्र. २०१७०१०३१६५११९७५३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2017.01.03 16:54:50 +05'30'

**( स्मिता निवतकर )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (म व बा वि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (म व बा वि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा / विधानपरिषद यांचे स्वीय सहाय्यक, विधानभवन, मुंबई.
६. मुख्य सचिव, यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. सर्व विभागीय उप आयुक्त, (आयुक्तालया मार्फत)
१०. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (आयुक्तालया मार्फत)
११. निवड नस्ती (का-९).